राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासासंदर्भात प्राप्त प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग,**
**शासन ज्ञापन क्रमांक: सुसंबै-२०१४/ प्र. क्र. ५३/ उद्योग-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २८ जानेवारी, २०१५.

**विषय:** राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासासंदर्भात प्राप्त प्रस्तावांना प्रशासकिय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ :**
१) शासन निर्णय क्र. आयआयआय- पॉलीसी २०१०/प्र. क्र. ७६८/उद्योग-२ दि. २२ फेब्रुवारी, २०१३.
२) शासन निर्णय क्रमांक: औपासू-२०१२/ प्र. क्र. २३४/उद्योग-२ दि.२५ फेब्रुवारी, २०१४.
३) कार्यालयीन आदेश क्रमांक: सुसंबै -२०१२/ प्र. क्र. ५३/उद्योग-२ दि. २९ मार्च,२०१४.
४) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून प्राप्त प्रस्ताव.
५) दि. २०/०३/२०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या पहिल्या बैठकीच इतिवृत्त दिनांक २९ मार्च, २०१४.
६) दि. १९/१२/२०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या दुसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दिनांक ६ जानेवारी, २०१५.

**ज्ञापन:**

राज्यात औद्योगिक पायाभूत सुविंधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत महाराऔद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेने प्रस्ताव सादर केले आहेत.

२. मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील "महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती" ने दि. २०/०३/२०१४ व दि. १९/१२/२०१४ रोजी झालेल्या बैठकीत सोबतच्या विवरणपत्रामध्ये नमूद केलेल्या ८ प्रस्तावांना मान्यता दिलेली आहे.

सदर सर्व प्रकल्पांसाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ ही कार्यान्वयन यंत्रणा असून महामंडळाने सन २०१३-१४च्या दरसूचीवर आधारित एकूण रु. २५२,४९,६५,०००/- (अक्षरी रु. दोनशे बावन्न कोटी एकोणपन्नास लक्ष पासष्ट हजार फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक सादर केलेले आहे.

३. सदर ८ प्रकल्पांच्या नकाशे व अंदाजपत्रकाची महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने तपासणी केली असून रु. २५२,४९,६५,०००/- (अक्षरी रु. दोनशे बावन्न कोटी एकोणपन्नास लक्ष पासष्ट हजार फक्त) इतक्या रकमेस तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यानुसार रु. २५२,४९,६५,०००/- (अक्षरी रु. दोनशे बावन्न कोटी एकोणपन्नास लक्ष पासष्ट हजार फक्त) इतक्या खर्चाचे नकाशे व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. ही शासन मान्यता संदर्भीय क्र. ५ व ६ येथे नमूद केलेल्या सकाणू समितीच्या दिनांक २०/०३/२०१४ व दिनांक १९/१२/२०१४ रोजी झालेल्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबवायच्या कार्यपध्दतीनुसार तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१२ /प्र. क्र. २३४ /उद्योग-२ दि. २५/०२/२०१४ मधील परि. ६ नुसार देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन देण्यात येत आहे.

५. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशीर्ष क्र. के-१०, मुख्य लेखाशीर्ष-४८७५ इतर उद्योगावरील भांडवली खर्च उपलेखाशीर्ष-६० इतर उद्योग, ८०० इतर खर्च, ८००(००) (०१) औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास व निर्मिती (योजनांतर्गत) (४८७५-००२५) या योजनेखाली उपलब्ध असलेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

६. सदर प्रकल्पांची सुरुवात सन २०१४-१५ या आर्थिक वर्षापासून होत आहे.

७. प्रस्तावित प्रकल्पांचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन व त्यासाठी शासनाच्या पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास यासाठीच्या निधीतून द्यावयाच्या रकमेचा तपशील सोबत जोडलेल्या विवरणपत्राप्रमाणे असेल.

८. राज्यात औद्योगिक पायाभूत सुविंधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत प्रकल्पांना प्रथमच मान्यता देण्यात आली आहे.

९. हे ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२१ / १४६१ दिनांक १०/७/२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २३२ / १४ / व्यय-१६ दिनांक २६/०८/२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१५०१२८११२२०२३३१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Venkatesh Hanamantrao Kulkarni

Digitally signed by Venkatesh Hanamantrao Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Venkatesh Hanamantrao Kulkarni
Date: 2015.02.07 17:57:09 +05'30'

**(व्यं. ह. कुलकर्णी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति:**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षण), मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई- ४०० ०३२.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ
७) आयुक्त, सांगली- मिरज-कुपवाड महानगरपालिका, सांगली.
८) वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६ ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी, (प्रशासन-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मुंबई-४०० ०३२.
११) निवड नस्ती (उद्योग-२)

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन ज्ञापन क्र. सुसंबै-२०१४/ प्र. क्र. ५३/ उद्योग-२ दि. २८/०१/२०१५ सोबतचे विवणपत्र

| अ. क्र. | पायाभूत सुविधा प्रकल्पांचा तपशिल व कार्यान्वयन यंत्रणा | कार्यान्वयन यंत्रणाने दिलेल्या तांत्रिक मान्यतेची रक्कम (रु. लाखात) | सक्षम प्राधिकाऱ्याकडूनप्रशासकीय मान्यता देण्यात आलेली रक्कम (रु. लाखात) | सुकाणू समितीने मान्यता दिल्यानुसार पायाभूत निधीतून द्यावयाची रक्कम (रु. लाखात) | सन २०१४-१५ साठी वितरीत करावयाची रक्कम (रु.लाखात) | सन २०१५-१६ साठी वितरीत करावयाची रक्कम (रु.लाखात) | सन २०१६-१७ साठी वितरीत करावयाची रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| I | II | III | IV | V | VI | VII | VIII |
| १. | रोहा औद्योगिक क्षेत्र -सध्या अस्तित्वात असलेल्या अरीखुर्द Effluent Disposal Point पासून शेवटच्या टप्प्यापर्यंत ६३० MM Dia HDPE line & diffuser उपलब्ध करणे (MIDC) | २८२९.२२ | २८२९.२२ | १४१४.६१० (५०%) | १३००.००० | १००.००० | १४.६१ |
| २. | राजीव गांधी इन्फोटेक पार्क, हिंजेवाडी - चांदे फाटा ते घोटावाडा फाटा रोड पर्यत पायाभूत सुविधा रस्ते इत्यादी उपलब्ध करुन देणे. (MIDC) | २५२.४४ | २५२.४४ | १२६.२२० (५०%) | १००.००० | २६.२२० | निरंक |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३. | सांगली-मिरज औद्योगिक क्षेत्र (मिरज ब्लॉक) - सध्याचा रस्ता नुतनीकरण करणे. (MIDC) | १०७.९३ | १०७.९३ | १०७.९३० (१००%) | १००.००० | ७.९३० | निरंक |
| ४. | सांगली-मिरज औद्योगिक क्षेत्र -कुपवाड व्हिलेज ते मिरज औद्योगिक क्षेत्र जोडरस्ताचे नुतनीकरण व दुरुस्ती करणे. (MIDC) | २२७.३१ | २२७.३१ | २२७.३१ (१००%) | २००.००० | २७.३१० | निरंक |
| ५. | नागपूर (हिंगणा) औद्योगिक क्षेत्र - सेंट्रल एमआयडीसी रस्त्याला Asphaltic Treatment देणे. (MIDC) | ७३८.२८ | ७३८.२८ | ३६९.१४० (५०%) | २५०.००० | १००.००० | १९.१४० |
| I | II | III | IV | V | VI | VII | VIII |
| ६. | उमरेड औद्योगिक क्षेत्र - ७.५ मीटर आणि ५.५ मीटर रुंदीच्या रस्त्याचे बांधकाम करणे व ZP रोडचे डांबरीकरण. (MIDC) | ८८९.६९ | ८८९.६९ | ४४४.८४५ (५०%) | ३५०.००० | ९०.००० | ०४.८४५ |
| ७. | राजीव गांधी इन्फो टेक पार्क, हिंजेवाडी, पुणे - ६.२० कि.मी. लांबीचे ६ पदरी रोड आणि मुळा नदीवर १२० मी. लांबी X २७.२० मी. रुंदीचा पुल बांधणे व इतर कामे. (MIDC) | १०६६५.५२ | १०६६५.५२ | ५३३२.७६० (५०%) | ५२००.००० | १००.००० | ३२.७६० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ८. | अतिरिक्त अमरावती औद्योगिक क्षेत्र टेक्सटाईल पार्क येथे ५ MLD क्षमतेचे CETP पुर्नप्रक्रिया २.५ MLD सह, विल्हेवाट यंत्रणा, CETP आवारातील SCADA आणि इंन्फ्रास्ट्रक्चर पुरविण्याबाबत. (MIDC) | ९५३९.२६ | ९५३९.२६ | ४७६९.६३० (५०%) | ४५५०.००० | १५०.००० | ६९.६३० |
| | एकूण | २५२४९.६५ | २५२४९.६५ | १२७९२.४४५ | **१२०५०.०००** | ६०१.४६० | १४०.९८५ |